# पानिपत आणि शेरलॉक होम्स भाग १ व २ एकत्र

## पानिपत आणि शेरलॉक होम्स - भाग १



बेकर स्ट्रीटवर २२१बी पाशी बग्गी थांबली. मजल्यावरील खिडकीतून डॉ वॉटसननी डोकावून पाहिले. ओव्हर कोट मधील शेरलॉक होम्स उतरताना त्यांनी पाहिले. त्यांच्या मनात आले आज कोणत्या केसवर काम चालू आहे ते कळेल.

हॅट, ओलसर ओव्हरकोट रॅकवर लटकला. ईझीचेयरचा कुरकूकता आवाज करून शेरलॉक बसले.



गोलाकार पाईप स्टँडमधून एक सीटर पाईप हातात घेऊन त्यांनी टोबॅको पाऊच मधील तंबाखू पाईपच्या चेंबरमधील बाऊलमधे भरली. घट्ट दाबून बसायला प्रेसरवर जोर दिला.



पहिला धूर नाकातून येताना पाहून वॉटसनला कळले की आज नवी केस हातात आली आहे.

'यू सी, माय डियर वॉटी',
'ओरिएंटल मॅप्स, पिक्चर्स ऑलवेज फॅसिनेट मी. लुक धिस वन. गॉट इट फ्रॉम डॅनीज कलेक्शन्स ऑन पॅनिपात बॅटल'

'ओह, डोंट मेक बॅफल्ड फेस वॉटी!'

झालं आणि त्यांच्यात चर्चा रंगली. 'आपल्या लंडनच्या ब्रिटिश लायब्ररीतील हे चित्र आहे.. विंको ओक रिटायर्ड फ्रॉम एयर फोर्स आहेत. ही इज् फॅसिनेटींग पर्सन. ते इतिहासकार काय म्हणतात त्यापेक्षा नकाशे, पिक्चर्स तुमच्याशी संवाद साधताना काय दिसते, उमगते यावर भर देतात'.
डॉ वॉटसननी चित्र आपल्याकडे ओढून पाहिले. बरीच गिचमिड असलेल्या काळेपांढऱ्या रंगात जनावरे, लष्करी हत्यारे धरून असलेले शिपाई वगैरे मधून काही अर्थबोध होत नाही असे वाटून ते चित्र परत शेरलॉक यांच्याकडे तोंड करून ठेवले.

'लूक, १७६१ साली मराठाज व दुर्रानी अहमद शा यांच्यात पॅनीपात गावाजवळ एक बॅटल खेळले गेले. त्याचे ते डीटेल चित्र आहे. मॅनोज डॅनी ने ते त्यांच्या "इन लाईट ऑफ रिडिसकव्हर्ड पानिपत बॅटल" पुस्तकात छापले आहे. शॅशी ओक सेंट इट टू मी'.
'ओह आय् सी!' डॉ वॉटसननी ते चित्र जवळून पहायला सुरवात केली. 'तो अफधाली रंगीत

करून दाखवलाय. लहान मोठ्या तोफांचे तांडे बार उडवत हवेत धुराचे लोट उठवत आहेत. हत्तीवरून काही सरदार ते पहात आहेत. सॉर्ट ऑफ डिंगडाँग बॅटल. एम् आय् करेक्ट'?
'ओ दॅट्स फाईन, वंडरफूल, सर्च, सर्च मोअर...!'
'डिड यू नोटिस, लेफ्ट साईड डाऊन कॉर्नर?

'नो!

'हॅव ए क्लोज लुक माय डियर, डॉक्टर वॉटसन! तिथे एक वेगळेच 'डिंगडाँग' चालले आहे!'

'कुड यू लोकेट? व्हॉट इज् दॅट?

'विंग कमांडर ओक रिक्वेस्टेड् कि या चित्रातील या दोन्ही गोष्टींचा एकमेकांशी संबंध कसा लावायचा? तो छडा मी लावावा. पत्र पाठवून ते मला म्हणतात, "सर शेरलॉक होम्स, तुम्ही ही केस हातात घेऊन सॉल्ह करा!"

"पण मला वाटते की इंडियन्सनी ह्याचा अर्थ लावला पाहिजे. माझे टेकनिक्स वापरून".

म्हणून ही केस इथल्या लोकांनी सोडविण्यासाठी सादर केली आहे.

जेम्स बाँड? २०२१ मधे प्रदर्शित होणाऱ्या सिरियल मधील नव्या रूपात शेरलॉक होम्स!



शेरलॉक होम्स यांच्या मनातून ते चित्र जात नव्हते.

काही दिवसांनी एका सायंकाळी पुन्हा डॉ वॉटसननी या विषयाला छेडले. ते म्हणाले, ' बॅटल ऑफ पॅनिपात वर मी वाचन केले. तो मोठा हिस्टॉरिकल इव्हेंट होता.'

यू नो वॅटी, 'त्या चित्रात ज्या लढाईच्या प्रसंगांना दाखवले आहे त्यातून ते चित्र काढणारा प्रत्यक्ष हजर असावा. म्हणून वेगवेगळ्या सरदारांच्या वेषभूषा, श्रीमंती, मानमरातब त्यातून दाखवलेला वाटतो.'

व्हिस्कीचा नवा पेग भरत शेरलॉक होम्सनी ग्लास डॉ वॉटसनला सरकवला.



चीअर्स, म्हणून शेरलॉक होम्सनी एक मोठा सिप घेऊन म्हटले, ‘त्या काळात नबाब, राजे आपल्या पदरी काही युरोपियन गोऱ्या लोकांना ठेवत असत. बरेचसे आर्मीमध्ये महत्त्वाची खाती तोफखाना, दारू बनवायचे कारखाने वगैरेचा मुख्य करत असत. अवधचा नबाब असे लोक ठेवून होता. त्यात एक फ्रेंच जो नंतर कर्नल म्हणून रिटायर झाला. त्याला भारतात नकाशे बनवायची, वाचन करायची कला होती. इथली भाषा जरी आली नाही तरी तो स्थानिक लोकांत मिळून मिसळून राही’.

‘इंटरेस्टिंग, नाव काय त्याचे? त्याचा या चित्रांशी काय संबंध’? शेरलॉक होम्स पटकन उभे राहिले. टेबलावरील ग्लोब गोल गोल फिरला. इंडियन कॉंटिनंटपाशी थांबवत ते म्हणाले, ‘धिस इज हिमालयन रेंज, नेक्स्ट रिव्हर्स गॅंजिस अँड जमुना. हियर डेल्ली. अप हियर पॅनिपात. नबाब शूजा वॉज नबाब ऑफ उध ऑर अवध. विथ हिम (Monsieur - मस्यू फ्रेंच उच्चारण - कोरनेल जां बातीस्ता जोसेव जॉंती) - मिस्टर कर्नल जॉन बातिस्टा जोसेफ गेंटिल सर्व्हिस करत होता. तो एकूण २५ वर्षे इंडियात राहिला. इतका मिसळला त्या मातीत कि लष्करी भपकेबाज कपडे, फ्रेंच चालिरीतींचा त्याला विसर पडला. बंगालमधे सुरवातीला त्याने दूप्लेस, ब्युसी, लॅली वैगेरेंच्या खाली काम केले. मीर जाफरने एका आपल्या मंत्र्याला आपल्या देखत मारल्याची किळस येऊन पाहून जॉंती अवध संस्थानाच्या शुजाउद्दौलाकडे नोकरीला लागला. लवकर तो नबाबाचा मित्र झाला.

दरबारात फ्रेंच एजंटचे श्रीमंती पद मिळवले. त्यांने भरपूर पैसे देऊन नकाशे बनवायच्या आपल्या आवडीच्या कामाला दिला. फावल्या वेळात हा टिवल्याबावल्या करतो, कामात लक्ष नाही, त्याने नेटीव्ह मित्र केलेत वगैरे आळ येऊन त्याला काढून टाका म्हणून आलेला वरिष्ठांचा आदेश नबाब शुजाने न मानता ठेवून घेतला. पण शुजा मेल्यावर त्याचे दिवस फिरले. काहींनी गंडवले. मित्र दिब्रॉसने त्याचे नकाशे पळवून आपल्या नावावर खपवायचा प्रयत्न केला'.



LE COLONEL GENTIL.

'वरील प्रमाणे चित्रे त्यांनी संग्रहित केली होती. त्यांनी असे फोटो चित्रे, मॅप्स संग्रह करून ते फ्रान्सला परतल्यावर तिथल्या राजाला दाखवून वाहवाही मिळवली. त्याच्या पश्चात मुलाने ते नंतर पुस्तकात छापले. राज्यात बदल झाल्यानंतर बिचाऱ्याची पेन्शन बंद झाली. त्याची पुढची २२ वर्षे हालाखीत गेली. पुअर फेलो'!

डॉ वॉटसननी मान डोलावली. 'इट वॉज ड्यु टू वी, युरोपियन्स नेटिव्ह्ज लर्नट मॅनर्स, एटिकेट्स, डिसिप्लिन, टाईमलीनेस, मेनी आर्ट्स, सायन्स, मिलिटरी टॅक्टिक्स'.

'येस बाय ऑल मीन्स. यु सी इंडियन्सना 'जुवेल इन द क्राऊन' म्हणून नावाजले जाते. दे वेयर क्विक लर्नर्स'.

'मार्क माय वर्ड्स, लेटर इयर्स दे विल रूल दि वर्ल्ड.'

'आय सी', डॉ वॉटसन म्हणाला. मनात शेरलॉकने वाचून मिळवलेली माहिती ऐकून थक्क झाला!

तेवढ्यात आलेले एक पार्सल फोडून वाचताना शेरलॉक होम्स यांचे डोळे विस्फारले.

'सीम्स, विंग कमांडर हॅज टेकन माय अॅडव्हाइज व्हेरी सीरियसली! ही हॅज सेंट मी सम फोटोज्'!




लेट मी एक्सॅमिन डॉ वॉटसन बडी, प्लीज एक्सक्यूज मी' म्हणत ते आपल्या लॅबोरेटरीत गेले.

